श्रीमती. शितल विठ्ठलराव ग-हाटे रसायन शास्त्रज्ञ ( गट ब ) यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमएनए-१००७/ प्र.क्र.७६८/उद्योग-९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २८ जानेवारी, २०१५

संदर्भ

१) शासन निर्णय क्रमांक:- एमएनए-१००७/ प्र.क्र.७६८/उद्योग-९, दि.२४.१०.२०११

२) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र.गोप/१५/२००५/१६८ , दिनांक ०८.०९.२०१४

**शासन निर्णय**

उपरोक्त संदर्भाधिन दिनांक २४.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये श्रीमती शितल विठ्ठलराव ग-हाटे यांना भूविज्ञान व खनिकर्म संचालनालयाच्या नागपूर येथील प्रमुख कार्यालयात रसायनशास्त्रज्ञ ( गट ब ) अनुसूचित जमाती या राखीव प्रवर्गातील पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्यात आली असून परिविक्षा कालावधी २ वर्ष विहीत करण्यात आलेला आहे. त्यानुसार श्रीमती ग-हाटे, यांनी दिनांक १९.११.२०११ ( म.पू ) रसायन शास्त्रज्ञ या पदाचा कार्यभार स्विकारला आहे.

श्रीमती ग-हाटे, यांच्या नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे २ वर्षाच्या परिविक्षा कालावधीत त्यांनी विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तथापि, रसायन शास्त्रज्ञ या पदाकरिता विभागीय परिक्षा विहीत करण्यात आलेली नाही. श्रीमती ग-हाटे, यांना तदर्थ मंडळाच्या मराठी व हिंदी भाषा परिक्षेला बसण्यापासून संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांच्या कार्यलयीन आदेश क्रमांक आस्थापना -१५८ / २०१४ / २१०२ , दिनांक १३.०८.२०१४ अन्वये सुट देण्यात आली आहे. श्रीमती ग-हाटे, यांनी शासनाने विहीत केलेली संगणक ( MSCIT ) परिक्षा उत्तीर्ण केलेली आहे.

परिविक्षा कालावधीत श्रीमती ग-हाटे, यांनी ३९ दिवस अर्जित रजा व १८० दिवस प्रसुती रजा उपभोगली आहे. त्यामुळे त्यांचा परिविक्षा कालावधी २१९ दिवसांनी पुढे जाऊन दि.२७.०६.२०१४ रोजी समाप्त होईल. त्यानुसार श्रीमती शितल विठ्ठलराव ग-हाटे , रसायन शास्त्रज्ञ ( गट- ब ) यांचा परिविक्षा कालावधी दिनांक २७.०६.२०१४ पासून संपुष्टात येत असून संचालनालयाच्या आस्थापनेवर त्यांची रसायन शास्त्रज्ञ ( गट- ब ) यापदावर नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२८१५४६०५००१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.02.10 15:01:29 +05'30'

**( संजय इंगळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.

२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर.

३. श्रीमती शितल विठ्ठलराव ग-हाटे , भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.

४. निवडनस्ती.